**भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खालील वाढीव मोबदला फरकाची रक्कम अदा करणेबाबत.**
**सीमा तपासणी नाका, कागल, जि.कोल्हापूर**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमव्हीडी-०४१२/प्र.क्र.७६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४१/भाग-१/अ-४, दि.३०.११.२०१६ व समक्रमांकाचे शासन शुद्धीपत्रक दि.२३.०२.२०१७
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
४) मा. दिवाणी न्यायालय (व.स्त.) कोल्हापूर यांचेकडील (१)भूसंदर्भ अर्ज क्र. १४/२०१२ (२) भूसंदर्भ क्र.११/२०१२ (३)१९/२०१२ मधील दिनांक ३०.१०.२०१७ रोजीचे न्यायालयीन आदेश.
५) शासन निर्णय समक्रमांक दि.१४.०३.२०२१
६) उपविभागीय अधिकारी, राधानगरी-कागल उपविभाग, जि- कोल्हापूर यांचे पत्र क्र. / भूसं/कावि-१२/२०२३, दिनांक १२.०१.२०२३.
७) परिवहन आयुक्त, मुंबई यांचे पत्र क्र. पआका/ का-२ अ/सीतना-आधु/प्र.क्र.५६/सितना कागल/ २०२३/ जा.क्र.२६६२, दिनांक २२.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका, कागल ता. कागल, जि.कोल्हापूर या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खालील (१) भूसंदर्भ क्र.११/२०१२ (२)भूसंदर्भ अर्ज क्र. १४/२०१२ (३)भूसंदर्भ १९/२०१२ या प्रकरणी उपर्निर्दिष्ठ क्र.४ येथील मा. दिवाणी न्यायाधिश (वरिष्ठ स्तर), कोल्हापूर यांनी दिलेल्या न्यायनिवाड्यानुसार वाढीव मोबदला फरकाची रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या संपादक संस्थेच्या सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका, कागल,ता.कागल, जि. कोल्हापूर या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खाली नमूद प्रकरणात मा. दिवाणी न्यायालय (व.स्त.), कोल्हापूर यांचेकडील (१) भूसंदर्भ क्र.११/२०१२ दि.३०.१०.२०१७ (२)भूसंदर्भ अर्ज क्र. १४/२०१२ दि.३०.१०.२०१७ (३)भूसंदर्भ १९/२०१२ दि.३०.१०.२०१७ या प्रकरणी रोजीच्या न्यायालयीन आदेशानुसार उपर्निर्दिष्ट क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये संबंधितांना वाढीव मोबदला अदा करण्यात आला होता.

आता उपर्निर्दिष्ठ क्र ६ व ७ अन्वये प्राप्त प्रस्तावानुसार,उपविभागीय अधिकारी, राधानगरी-कागल उपविभाग, कोल्हापूर यांनी वाढीव मोबदला फरकाची रक्कम परिगणित केली असून, संबंधित भूधारकांना वाढीव मोबदला फरकाची एकत्रित रक्कम रु रु. ३३,८७,९९३/- (अक्षरी रु. तेत्तीस लाख सत्त्याऐंशी हजार नवशे त्र्यान्नव रुपये फक्त) मा. दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) कोल्हापूर येथे भरणा करण्यासाठी, या शासन निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-१ ते ३ मध्ये** नमूद केल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची रक्कम पुढील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

अ) सदर प्रकरणात दाखल (१) भूसंदर्भ क्र.११/२०१२ दि.३०.१०.२०१७ (२)भूसंदर्भ अर्ज क्र. १४/२०१२ दि.३०.१०.२०१७ (३)भूसंदर्भ १९/२०१२ दि.३०.१०.२०१७ या संबंधित भूधारक यांना मा. दिवाणी न्यायाधिश (व.स्तर), कोल्हापूर यांनी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने कलम २८-अ अंतर्गत अर्ज दाखल करणारे भूधारकांना मूळ निवाड्याप्रमाणे देण्यात आलेली रक्कम तसेच उपर्निर्दिष्ठ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली रक्कम वजाती करुन उर्वरीत वाढीव मोबदला फरकाची रक्कम देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

आ) सदर प्रकरणातील भूधारकाने कलम १८ अंतर्गत याच सर्व्हे नंबरसाठी दिवाणी न्यायालयात संदर्भ दाखल केला नाही. कलम २८-अ अंतर्गत प्रकरण दाखल केलेल्या भूधारकांना वाढीव मोबदला कलम १८ अंतर्गत मिळाल्याने निदर्शनास आल्यास शासनाची रक्कम नियमानुसार त्यांचे स्थावर व जंगम मालमत्तेची विल्हेवाट लावून वसूल करण्याचा अधिकार शासनास राहील असे प्रतिज्ञापत्र मोबदला अदा करतेवेळी भूधारकांकडून घेण्यात येईल.

इ) उप सचिव, महसूल व वन विभाग यांचे पत्र क्र. ०६/२०१५/ प्र.क्र. ८२/अ-२, दिनांक २९.०८.२०१५ च्या अनुषंगाने संबंधित भूधारकांना मोबदला अदा करण्यापूर्वी देय रक्कमेएवढ्या रकमेची बँक गॅरेंटी संबंधित जमिन मालकाकडून घेण्यात येईल. तसेच, पैसे परत करण्याचे प्रतिज्ञापत्र संबंधित भूधारकाकडून घेण्यात येईल.

ई) निधी अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर अनुदान खर्च होणार नाही तसेच मा. न्यायालयाच्या आदेशानुसार वाढीव मोबदला फरकाची रक्कम अदा करण्यास विलंब होणार नाही याबाबतची दक्षता उपविभागीय अधिकारी, राधानगरी-कागल उपविभाग, कोल्हापूर तसेच प्रादेशिक परिवहन अधिकारी, कोल्हापूर यांनी घ्यावी.

३. या बाबीसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र. मागणी क्र. बी-३ २०४१, वाहनांवरील कर, (०१) (०५) सीमा तपासणी नाक्यांचे आधुनिकीकरण व संगणकीकरण (२०४१ ०३१२) १३- कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. परिवहन आयुक्त, मुंबई यांनी वरील लेखाशिर्षांतर्गत त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीपैकी सोबत जोडलेल्या परिशिष्ट-१ ते परिशिष्ट-७ मधील नमूद रक्कम उपविभागीय अधिकारी, राधानगरी-कागल उपविभाग, कोल्हापूर यांना बीडीएस प्रणालीवर तात्काळ वर्ग करावी.

५. उपविभागीय अधिकारी, राधानगरी-कागल उपविभाग, कोल्हापूर यांनी या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. कोणत्याही वादी/खातेदारास उपविभागीय अधिकारी, राधानगरी-कागल उपविभाग, कोल्हापूर व न्यायालयामार्फत कोणत्याही बाबतीत दुहेरी फायदा मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी,कोल्हापूर यांनी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३१२१०१३७२७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.04.10 19:30:39 +05'30'

**(भरत रा. लांघी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, पुणे.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
७) सह सचिव, (भूसंपादन) महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उपविभागीय अधिकारी, राधानगरी-कागल उपविभाग, कोल्हापूर.
९) प्रादेशिक परिवहन अधिकारी , कोल्हापूर
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
११) जिल्हा सरकारी वकील, कोल्हापूर
१२) महालेखापाल-१/२ ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१३) महालेखापाल-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१४) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) वित्त विभाग (अर्थसंकल्प शाखा-१२/व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती (परिवहन-४).

| परिशिष्ट-१ | | |
|---|---|---|
| न्यायालयीन प्रकरण क्र. ११ /२०१२ | | |
| शेतकऱ्याचे नाव : श्री. मुजिब गुलाब मुल्ला | | |
| घर न./शेत सर्व्हे क्र.१९/१/२ पै संपादीत क्षेत्र १.०८ हे.आर. | | |
| भूसंपादन प्रकरण क्र.१७६/२०१७ मौजा कागल, जि. कोल्हापूर | | |
| **अ. क्र.** | **तपशिल** | **रक्कम** |
| १. | मा.न्यायालयाचे दिनांक ३०.१०.२०१७ रोजीच्या आदेशान्वये वाढीव मोबदला दर-१६,८४,०००/-प्र.हे. भूसंपदान क्षेत्र १.०८ हे.आर | रु.१६,८४,८००/- |
| २. | न्यायालयाच्या दिनांक ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार ३०% दिलासा रक्कम- | रु.५,०५,४४०/- |
| ३. | न्यायालयाच्या दिनांक ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार १२% प्रमाणे प्रति वर्ष विशेष घटक अंतर्गत रक्कम- (दि.०५.०३.२००९ ते दि.११.०४.२०११ कालावधी ७६७ दिवस) (७६७ X १२% /१२ X१९ =४,२४,८४७/-) | रु.४,२४,८४७/- |
| **४.** | **एकूण स्तंभ १ ते ३ ची बेरीज** | **रु.२६,१५,०८७/-** |
| ५. | न्यायालयाच्या दि. ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार ९% दराने व्याज (दि. १३.०८.२०१३ ते १२.०८.२०१४) | रु.२,३५,३५८/- |
| ६. | न्यायालयाच्या दि. ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार १५% दराने व्याज (दि. १३.०८.२०१४ ते दि. ३१.०३.२०१९ (१६९१ दिवस | रु.१८,१७,३०६/- |
| ७. | **एकूण स्तंभ ४, ५ ,६ ची बेरीज** | **रु.४६,६७,७५१/-** |
| ८. | दि. ०३.०४.२०१९ रोजी प्रादेशिक परिवहन विभागाने न्यायालयाच्या आदेशानुसार भरणा करण्यात आलेली रक्कम | रु.३९,३७,५३९/- |
| **९.** | **अर्जदाराला उर्वरित देय रक्कम (७-८)** | **रु.७,३०,२१२/-** |
| **१०.** | अतिरिक्त १५% दराने व्याज (दि. ०१.०४.२०१९ ते दि. २३.०१.२०२३ (१३९३ दिवस | **रु.४,१८,०२१/-** |
| **११.** | **कोर्ट फि** | - |
| **१२** | **अर्जदारास देय रक्कम (९+१०+११)** | **रु.११,४८,२३३/-** |

| **परिशिष्ट-२** | | |
|---|---|---|
| न्यायालयीन प्रकरण क्र. १४ /२०१२ | | |
| शेतकऱ्याचे नाव : श्री. नौसीन मुजीब मुल्ला | | |
| घर न./शेत सर्व्हे क्र.१९/१/९ पै संपादीत क्षेत्र ०.७७ हे.आर. | | |
| भूसंपादन प्रकरण क्र.१७५/२०१७ मौजा कागल, जि. कोल्हापूर | | |
| **अ. क्र.** | **तपशिल** | **रक्कम** |
| १. | मा.न्यायालयाचे दिनांक ३०.१०.२०१७ रोजीच्या आदेशान्वये वाढीव मोबदला दर-१६,०१,६००/-प्र.हे. भूसंपदान क्षेत्र ०.७७ हे.आर | रु.१६,०१,६००/- |
| २. | न्यायालयाच्या दिनांक ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार ३०% दिलासा रक्कम- | रु.४,८०,४८०/- |
| ३. | न्यायालयाच्या दिनांक ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार १२% प्रमाणे प्रति वर्ष विशेष घटक अंतर्गत रक्कम- (दि.०५.०३.२००९ ते दि.११.०४.२०११ कालावधी ७६७ दिवस) (७६७ X १२% /१२ X१९ =४,०३,८६६/-) | रु.४,०३,८६६/- |
| **४.** | **एकूण स्तंभ १ ते ३ ची बेरीज** | **रु.२४,८५,९४६/-** |
| ५. | न्यायालयाच्या दि. ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार ९% दराने व्याज (दि. १३.०८.२०१३ ते १२.०८.२०१४) (३६५ दिवस) | रु.२,२३,७३५/- |
| ६. | न्यायालयाच्या दि. ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार १५% दराने व्याज (दि. १३.०८.२०१४ ते दि. ३१.०३.२०१९ (१६९१ दिवस | रु.१७,२७,५६२/- |
| ७. | **एकूण स्तंभ ४,५,६ ची बेरीज** | **रु.४४,३७,२४३/-** |
| ८. | दि. ०३.०४.२०१९ रोजी प्रादेशिक परिवहन विभागाने न्यायालयाच्या आदेशानुसार भरणा करण्यात आलेली रक्कम | रु.३७,४३,०९३/- |
| ९. | **अर्जदाराला उर्वरित देय रक्कम (७-८)** | **रु.६,९४,१५०/-** |
| **१०.** | अतिरिक्त १५% दराने व्याज (दि. ०१.०४.२०१९ ते दि. २३.०१.२०२३ (१३९३ दिवस) | **रु.३,९७,३७७/-** |
| **११.** | **कोर्ट फि** | - |
| **१२** | **अर्जदारास देय रक्कम (९+१०+११)** | **रु.१०,९१,५२७/-** |

**परिशिष्ट-३**

न्यायालयीन प्रकरण क्र. १९ /२०१२

शेतकऱ्याचे नाव : श्रीम.नर्गिस गुलाब मुल्ला

घर न./शेत सर्व्हे क्र.१९/१/२ पै संपादीत क्षेत्र १.०८ हे.आर.

भूसंपादन प्रकरण क्र.१७७/२०१७ मौजा कागल, जि. कोल्हापूर

| अ. क्र. | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १. | मा.न्यायालयाचे दिनांक ३०.१०.२०१७ रोजीच्या आदेशान्वये वाढीव मोबदला दर-१६,८४,०००/-प्र.हे. भूसंपदान क्षेत्र १.०८ हे.आर | रु.१६,८४,८००/- |
| २. | न्यायालयाच्या दिनांक ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार ३०% दिलासा रक्कम- | रु.५,०५,४४०/- |
| ३. | न्यायालयाच्या दिनांक ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार १२% प्रमाणे प्रति वर्ष विशेष घटक अंतर्गत रक्कम- (दि.०५.०३.२००९ ते दि.११.०४.२०११ कालावधी ७६७ दिवस) (७६७ X १२% /१२ X१९ =४,२४,८४७/-) | रु.४,२४,८४७/- |
| **४.** | **एकूण स्तंभ १ ते ३ ची बेरीज** | **रु.२६,१५,०८७/-** |
| ५. | न्यायालयाच्या दि. ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार ९% दराने व्याज (दि. १३.०८.२०१३ ते १२.०८.२०१४) | रु.२,३५,३५८/- |
| ६. | न्यायालयाच्या दि. ३०.१०.२०१७ च्या आदेशानुसार १५% दराने व्याज (दि. १३.०८.२०१४ ते दि. ३१.०३.२०१९ (१६९१ दिवस | रु.१८,१७,३०६/- |
| ७. | **एकूण स्तंभ ४,५, ६ ची बेरीज** | **रु.४६,६७,७५१/-** |
| ८. | दि. ०३.०४.२०१९ रोजी प्रादेशिक परिवहन विभागाने न्यायालयाच्या आदेशानुसार भरणा करण्यात आलेली रक्कम | रु.३९,३७,५३९/- |
| ९. | **अर्जदाराला उर्वरित देय रक्कम (७-८)** | **रु.७,३०,२१२/-** |
| **१०.** | अतिरिक्त १५% दराने व्याज (दि. ०१.०४.२०१९ ते दि. २३.०१.२०२३ (१३९३ दिवस | **रु.४,१८,०२१/-** |
| **११.** | **कोर्ट फि** | - |
| **१२** | **अर्जदारास देय रक्कम (९+१०+११)** | **रु.११,४८,२३३/-** |